महादेवखार म्हाळूंगे खारभूमी योजना, ता. रोहा, जि. रायगड . या योजनेच्या सा.क्र. ० ते १११० मी. मधील बांधाचे आणि सा.क्र.४५ मी. व सा.क्र.१०५० मी. वरील उघाडीचे बांधकाम करणे या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणे बाबत.

महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो - २०२३/प्र.क्र.३१ /खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०७ मार्च, २०२४

पहावे-

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. मुअकोप्र/खाभुयो / खारभूमी / तां-३ / २६७, दिनांक २४/०१/२०२३ चे पत्र

प्रस्तावना:-

महादेवखार म्हाळूंगे खारभूमी योजना, ता. रोहा, जि. रायगड ही योजना रेवदंडा खाडीजवळ कुंडलीका नदीच्या तीरावर आहे. रायगड जिल्ह्यातील खारभूमी विकास योजनेच्या बृहत आरखड्यात रोहा तालुक्यातील अ. क्र. ०५ व पृष्ठ क्र.४८ वर समाविष्ट आहे. तसेच केद्रिंय पर्यावरण व वन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे कडील पत्र जा. क्र. जे-१७०११/३२/२००१ /आय -३/दिनांक २२/८/२००३ अन्वये सागरी नियमन कायदा १९९१ मधून सूट दिलेल्या कोकणातील एकूण ५७५ (रायगड जिल्हातील १६५ खारभूमी योजना) खारभूमी योजनांमध्ये या योजनेचा समावेश आहे.

सदर योजना भविष्यकालीन असुन सदर योजनेचे बांधकाम आद्याप झालेले नाही. सदर योजनेमुळे ९१ हेक्टर क्षेत्र पुनःप्रापीत होणार आहे. योजनेच्या बांधाची एकूण लांबी १११० मीटर आहे, तसेच या योजनेवर सा. क्र. ४५ मी. आणि सा.क्र. १०५० मी. अशा एकुण २ उघाड्या आहेत. सा.क्र. ४५ मी. व सा.क्र. १०५० मी. वर प्रत्येकी दोन गाळयाच्या दोन उघाड्या असून उघाडीचे बांधकाम दगडी आहे. त्या उघाड्या स्थानिक शेतकऱ्यांनी स्वखर्चाने बांधलेल्या आहेत. सदर उघाड्यांवर आजपर्यंत कोणत्याही प्रकारचा खर्च खारभूमी विभागाकडून करण्यात आलेला नाही. सदर उघाडीची मोठ्या प्रमाणात पडझड झालेली आहे त्यामुळे सा.क्र. ४५ मी. व सा.क्र. १०५० मी वरील उघाड्यांचे बांधकाम संधानकामध्ये प्रस्तावित केलेले आहे.

सदर योजनेच्या बांधाची माथा पातळी HEC-RAS प्रणालीद्वारे ठरविण्यात आली आहे. सध्याच्या तांत्रिक मानकानुसार खाडीकडील बाजूस १.५०:१ व शेताकडील बाजूस १.५०:१ असे उतार प्रस्तावीत केले आहेत. सदर योजनेचे काम ४४०२ मूळ बांधकामे या लेखाशिर्षांतर्गत प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्तावित करणेत येत आहे.

योजनेचा पुन:प्रापित क्षेत्रानुसार प्रति हेक्टरी खर्च रु. ४,६६,८९२/- इतका येत असून तो सध्याच्या प्रचलित आर्थिक मापदंड रु. ७,९३,२०६ /- पेक्षा कमी आहे.

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भीय पत्रान्वये प्राप्त झालेला महादेवखार म्हाळूंगे खारभूमी योजना, ता. रोहा, जि. रायगड या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

महादेवखार म्हाळूंगे या खारभूमी योजनेच्या कामास जलसंपदा विभाग दरसूची सन २०२२-२०२३ वर आधारित अंदाजित रूपये ४,२४,८७,१४९/- (रुपये चार कोटी चोवीस लक्ष सत्याऐंशी हजार एकशे एकोणपन्नास फक्त) इतक्या रक्कमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या "परिशिष्टामध्ये" देण्यात येत आहे. सदरील प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय -५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत ) (४४०२ ०३८४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) प्रस्तावित योजनेचा खर्च लेखाशिर्ष ४४०२ ०३८४ खाली उपलब्ध निधीमधून होणार असल्याने या लेखाशिर्षाखाली प्रगतीपथावरील योजनांचे दायित्व विचारात घेऊन योजना विहित कालावधीत व प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण होत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३) शासन शुध्दीपत्रक दिनांक १५.०१.२०२४ मधील अ.क्र. २ नुसार खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुनःप्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/-रोख व रुपये ३००/- मजुरीच्या स्वरूपात किंवा रोखीने ) घेण्यात यावा. याप्रमाणे लाभधारकांचा सहभाग निधी प्राप्त झाल्यानंतरच योजनेचे कामास सुरुवात करावी. सहभाग शुल्क संकलनाची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. शासन निर्णय दिनांक ०४.०३.२०२२ मधील परिच्छेद क्र. २(३) नुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करण्यात यावी.

४) सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पीय केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५) सदर प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

६) प्रचलित शासन निर्णय,नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

७) सदर योजनेच्या प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

८) संपूर्ण योजना सदर प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावी.

सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व सह सचिव तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४८/२३ कार्यासन १४३४, दिनांक १३.१०.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता या विभागातील खारभूमी कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत १९ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७११५१५८३०२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र :-** परिशिष्ट अ

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.07 12:01:09 +05'30'

**( प्रवीण कोल्हे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य ,यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री, (वित्त व नियोजन ) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद / विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (जलसंपदा ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१०. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.

११. जिल्हाधिकारी, रायगड.

१२. मुख्य अभियंता, (द व प्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.

१४.आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.उप सचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.

१७. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. अवर सचिव, अर्थ शाखा १/२,मंत्रालय, मुंबई.

१९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.

२०. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन -१४३४) ,मंत्रालय, मुंबई.

२१. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०२३/प्र. क्र.३१ / खारभूमी
दिनांक : ०७/०३/२०२४ चे सहपत्र)

## परिशिष्ट अ

**महादेवखार म्हाळूंगे खारभूमी योजना, ता. रोहा, जि. रायगड . सा.क्र.० ते १११० मी. मधील बांधाचे आणि सा.क्र.४५ मी. व सा.क्र.१०५० मी. वरील उघाडीचे बांधकाम करणे या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | अंदाजपत्रकीय किंमत (रूपये) |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | ब- भूमी संपादन | ०.०० |
| ३ | क- कामे बंधारा | १,५५,०१,२२३.०० |
| ४ | फ- आर.एच.टी. वर्क | १,२८,१४,९५८.०० |
| ५ | के- इमारती | ०.०० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | ८,२६,३७९.०० |
| | **एकूण कामे रुपये** | **२,९१,४२,५६०.००** |
| | इन्सुरन्स १ % | २,९१,४२६.०० |
| | गौण खनिज | ४८,९३,२४६.०० |
| | जी. एस. टी. १८ % | ५२,४५,६६१.०० |
| | अनुषांगिक खर्च १० % | २९,१४,२५६.०० |
| | **एकूण रुपये** | **४,२४,८७,१४९.००** |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ९१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये ४,६६,८९२ /- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.१६ |

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.07 12:01:29 +05'30'

(प्रवीण कोल्हे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन